**राज्य व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या अध्यक्षांच्या नैमित्तीक रिक्त कालावधीत संबंधित आयोगातील वरिष्ठतम सदस्याने प्रभारी अध्यक्ष म्हणून कामकाज पहाणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्रासंअ २०२१/प्र.क्र.५६/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक : २१ सप्टेंबर, २०२१.

संदर्भ: अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांचे पत्र No.SCDRC/Mah/Desk-१/ Notification/२४६२/२०२१, दि.२३.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९ चे कलम ३६ नुसार, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगातील प्रकरणांची सुनावणी अध्यक्ष व किमान एक सदस्य यांनी एकत्र बसून घेणे आवश्यक असल्यामुळे प्रकरणांच्या सुनावणींसाठी अध्यक्ष असणे अनिवार्य आहे. तथापि, Consumer Protection (Salary, allowances and conditions of service of President and Members of the State Commission and District Commission) Model Rules, २०२० च्या नियम ६ नुसार राज्य आयोग व जिल्हा आयोगातील अध्यक्ष पदाच्या नैमित्तीक रिक्तता कालावधीत (Casual vecancy) राज्य सरकारला अध्यक्षाच्या रिक्त पदावर वरिष्ठतम सदस्याची नेमणूक करण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

या नियमानुसार राज्य आयोगाचे अध्यक्ष किंवा एखादया जिल्हा आयोगातील अध्यक्ष रजेवर असल्यास संबंधित आयोगातील वरिष्ठतम सदस्य प्रभारी अध्यक्ष या नात्याने रजा कालावधीत आयोगाचे कामकाज चालवू शकतील. तात्पुरत्या कालावधीसाठी आयोगाचे अध्यक्ष अनुपस्थित असल्यामुळे कोणत्याही ग्राहक आयोगाचे कामकाज ठप्प होणार नाही आणि उर्वरित दोन सदस्यांपैकी वरिष्ठतम सदस्य प्रभारी अध्यक्ष म्हणून सुनावणी प्रभावीपणे घेवू शकणार असल्यामुळे राज्य शासनाने याबाबत स्थायी आदेश निर्गमित करण्याची विनंती संदर्भाधीन राज्य आयोगाच्या पत्रान्वये करण्यात आलेली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय: -**

Consumer Protection (Salary, allowances and conditions of service of President and Members of the State Commission and District Commission) Model Rules, २०२० च्या नियम ६ अंतर्गत राज्य आयोग व जिल्हा आयोगातील अध्यक्षांच्या रजा किंवा इतर अन्य कारणांमुळे (कार्यकाळ संपुष्टात आल्यामुळे पद रिक्त झाले असल्यास ते वगळून) अध्यक्ष पद तात्पुरत्या स्वरुपात रिक्त झाले असल्यास ( Casual Vacancy) अशा कालावधीत संबंधित आयोगातील वरिष्ठतम सदस्य (नियुक्तीच्या क्रमाने ) प्रभारी अध्यक्ष म्हणून आयोगातील सुनावणीचे कामकाज पाहतील. राज्य आयोगाचे अध्यक्ष किंवा जिल्हा आयोगाचे अध्यक्ष हे पदावर पुन्हा रुजू झाल्यानंतर वरिष्ठतम सदस्याकडील प्रभारी अध्यक्ष पदाचे अधिकार आपोआप संपुष्टात येतील.

उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२१०९२११४५८०२६६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Katikar
Padmavati

Digitally signed by Katikar Padmavati
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a8ad7b53d0557c046089b7688f952dd3fa64ce328691d88242bbde043cba86c, serialNumber=ec2d6c76e02d91ee9f71efe012213ab98a56fdcc6bffb5ce4ef3fafa682eb741, cn=Katikar Padmavati
Date: 2021.09.21 14:59:44 +05'30'

**( प. न. काटीकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, (विधानसभा / विधानपरिषद)
४) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव
६) सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
७) महालेखापल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व परीक्षा), महाराष्ट्र १ /२ मुंबई/नागपूर
१०) प्रबंधक (प्रशासन), प्रबंधक (विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
११) सर्व अध्यक्ष / सदस्य, राज्य /जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) सह सचिव (ग्रासं-४), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५) निवडनस्ती ग्रासं-४.